**सन २०१८-१९ च्या खरीप हंगामातील दुष्काळ सदृश्य तालुक्यातील महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचे परीक्षा शुल्क माफ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः शुल्क-५२१८/प्र.क्र.४१३/मशि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०३ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :-

(१) शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्र.एफईडी-१५९२/१२०२/(११३२)/साशि-५, दिनांक १८.१०.१९९३.

(२) महसूल व वन विभाग शासन निर्णय, क्र.एससीवाय-२०१८/प्र.क्र.८९/म-७, दिनांक २३ ऑक्टोबर, २०१८.

(३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.एससीवाय-२०१८/प्र.क्र.८९/म-७, दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१८.

**शासन परिपत्रक :-**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील टंचाईग्रस्त भागातील विद्यार्थ्यांची विद्यापीठ व परीक्षा मंडळे यांची परीक्षा फी माफ करण्याची योजना लागू केली आहे. यामध्ये अकृषी विद्यापीठांकडून घेण्यात येणाऱ्या परीक्षांचा समावेश आहे. आता उपरोक्त संदर्भाधीन क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये महसूल व वन विभागाकडून राज्यातील सन २०१८-१९ च्या खरीप हंगाम Trigger-२ लागू केलेल्या तालुक्यांमध्ये दुष्काळ सदृश्य परिस्थिती जाहीर करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयान्वये दुष्काळ सदृश्य परिस्थितीवर उपाययोजना करण्यासाठी केलेल्या उपाययोजनांमध्ये महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचे परीक्षा शुल्क माफ करण्याची सवलत लागू केलेली आहे. यास्तव सदर दुष्काळ सदृश्य तालुक्यांमधील महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या परीक्षा शुल्क माफीसंबंधी संदर्भाधीन क्र.०१ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार तात्काळ कार्यवाही करण्यात यावी. यासाठी आवश्यक असल्यास निधीची तरतूद करण्यासाठी संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तातडीने प्रस्ताव सादर करावा.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८११०३१३०४४०५८०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hariram V Parhate

Digitally signed by Hariram V Parhate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8bfd656b321bf6c348564562d46cd2934b62b770484625206559a2c204e56cb8, serialNumber=d01f16685aedf1abc9cfd58347280b4c4cb8d304afd1d413884ef4d91aa1462d, cn=Hariram V Parhate
Date: 2018.11.03 13:07:31 +05'30'

**( ह. व्यं. पऱ्हाते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व जिल्हाधिकारी,
२. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण (संचालक, उच्च शिक्षण यांच्यामार्फत),
४. सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. उप सचिव (म-७), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. कार्यासन अधिकारी (मशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. निवडनस्ती (मशि-२).